बी.बी.झुलेखा रिसर्च फाऊंडेशन फॉर सोशिओ इकॉनोमिक रुरल डेव्हलपमेंट इन्स्टिट्युशन, वर्धा संचलित खान कॉलेज ऑफ ॲडव्हान्स टेक्नॉलॉजी वर्धा (संस्था क्र.१२९५) या संस्थेची मान्यता पुन:स्थापित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: न्यायप्र-२०१६/(प्र.क्र.६४ /२०१६)/तांशि-५**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- १८ जानेवारी, २०१७.**

**संदर्भ:-** १. शासन निर्णय क्रमांक मान्यता-२०१४/(प्र.क्र.१३३/१४)/तांशि-५, दि.८ डिसेंबर, २०१५.
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील क्र.मरातंशिमं/का-५०/ न्यायालयीन/२०१६/७३१६, दि. ०८ नोव्हेंबर, २०१६ रोजीचे पत्र.
३. मा.उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.८९५/२०१६ मध्ये दि.१९ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेले आदेश.

**प्रस्तावना :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने केलेल्या शिफारशीस अनुसरुन सन २००१-०२ ते २०११-१२ या कालावधीतील शिष्यवृत्ती वाटपातील अनियमिते संदर्भात दोषी असल्याचे आढळून आल्या आहेत, अशा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाशी संलग्नित ज्या १८संस्थांची शासन मान्यता रद्द करण्याबाबत संदर्भ क्र. १ येथील दि. ८ डिसेंबर, २०१५ रोजी शासन आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये सन २००१-०२ ते २०११-१२ या कालावधीत गैर व्यवहार झालेल्या संस्थांचा समावेश आहे. तशा प्रकारचा उल्लेख सदर शासन निर्णयाच्या प्रस्तावनेमध्ये देखील करण्यात आलेला आहे. मात्र, हा शासन निर्णय निर्गमित करताना नजर चुकीने, “सन २००१-२०१२ ऐवजी सन २००५-१० या कालावधीत मागास वर्गीय विद्यार्थ्यांना मिळणाऱ्या शिष्यवृत्ती, शिक्षण / परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेमध्ये आर्थिक गैरव्यवहारात दोषी आढळलेल्या वर्धा जिह्यातील असणाऱ्या १८ संस्थांना विविध अभ्यास क्रमांना दिलेली शासन मान्यता रद्द करण्यात येत आहे”, अशा स्वरुपाचा उल्लेख करण्यात आलेला आहे. या १८ संस्थांमध्ये बी.बी.झुलेखा रिसर्च फाऊंडेशन फॉर सोशिओ इकॉनोमिक रुरल डेव्हलपमेंट इन्स्टिट्युशन, वर्धा संचलित खान कॉलेज ऑफ ॲडव्हान्स टेक्नॉलॉजी, वर्धा (संस्था क्र.१२९५) या संस्थेचा समावेश आहे. ही संस्था सन २०१०-११ ते २०११-१२ या कालावधीतील शिष्यवृत्ती गैरव्यवहारामध्ये असल्याचा समाजकल्याण विभागाचा अहवाल आहे. मान्यता काढून घेण्याच्या या शासन आदेशाच्या विरोधात बी.बी.झुलेखा रिसर्च फाऊंडेशन फॉर सोशिओ इकॉनोमिक रुरल डेव्हलपमेंट इन्स्टिट्युशन, वर्धा या संस्थेने मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाकडे रिट याचिका क्र.८९५/२०१६ दाखल केली होती. तथापि, शासन निर्णयामध्ये केवळ २००५-२०१० या कालावधीत शिष्यवृत्तीमध्ये गैर व्यवहार

केलेल्या संस्थांची मान्यता रद्द करण्याचा निर्णय घेण्यात येत असल्याचे नमूद करण्यात आले असल्याने आणि या कालावधीत सदर संस्था प्रत्यक्षात २०११-१२ मध्ये सुरु झालेली असल्याने हा मुद्दा विचारात घेऊन मा. उच्च न्यायालयाने दि.१९ ऑगस्ट, २०१६ च्या आदेशान्वये, मान्यता रद्द करण्याबाबतचे दि.८ डिसेंबर, २०१५ चे शासन आदेश रद्द केलेले आहेत.

**शासन निर्णय :-**

मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने रिट याचिका क्र.८९५/२०१६ च्या संदर्भात दि.१९ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेले आदेश विचारात घेता बी.बी.झुलेखा रिसर्च फाऊंडेशन फॉर सोशिओ इकॉनोमिक रुरल डेव्हलपमेंट इन्स्टिट्युशन, वर्धा संचलित खान कॉलेज ऑफ अॅडव्हान्स टेक्नॉलॉजी, वर्धा (संस्था क्र.१२९५) या संस्थेची शासन मान्यता रद्द केल्याबाबतचे आदेश या शासन निर्णयांन्वये रद्द करण्यात येत आहेत.

२. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई व संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांनी त्याअनुषंगाने पुढील योग्य ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११८१७३३४८१४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2017.01.18 17:37:28 +05'30'

**(अ. र. काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संबंधित संस्था (महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेमार्फत)
५. निवड नस्ती/तांशि-५.